**मौजे दिघोरी (मोठी), ता. लाखांदूर, जि. भंडारा, येथे पोलीस ठाणे, दिघोरी, याच्या नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांक पोप्रमा १०१६/प्र.क्र.६९७ /पोल-७

२रा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २० डिसेंबर, २०१६.

<u>वाचा</u> : पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमंस/२७-बी/२८बी-२/भंडारा-पो.स्टे.दिघोरी-प्रशा.इमा.बांध./३५/ २०१५, दिनांक १८.०३.२०१६.

**शासन निर्णय**

मौजे दिघोरी (मोठी), ता. लाखांदूर, जि. भंडारा, येथे पोलीस ठाणे, दिघोरी, याच्या नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करण्यासाठी, संदर्भाधीन पत्राव्दारे सादर केलेल्या प्रस्तावानुसार, रु.९१,९३,१२५ (रुपये एक्याण्णव लाख, त्र्याण्णव हजार, एकशे पंचवीस फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास, खालील अटींच्या अधीन राहून, याव्दारे, प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी:-**

१) सदर कामासाठी निधी उपलब्ध झाल्याशिवाय प्रत्यक्ष बांधकामास सुरुवात करु नये.
२) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.
३) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
४) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.
५) प्रत्यक्ष काम करतेवेळी शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्र. इएनव्ही- २०१३/ प्र.क्र.१७७/तां.क., दिनांक १० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

२. सदर बांधकामाचा निधी “मागणी क्र. बी-१० मुख्यलेखाशीर्ष, ४०७०, इतर प्रशासकीय सेवांवरील भांडवली खर्च, (००) ८०० इतर खर्च (००) (११) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे (४०७० ०२११) (योजनांतर्गत), ५३ मोठी बांधकामे” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून तो चालू वित्तीय वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उप-विभाग-पाच, अनुक्रमांक-१, अनुसार प्रशासनिक विभाग या नात्याने गृह विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१२२०१७३८३६९७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2016.12.20 17:44:35 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. राज्यमंत्री, गृह (शहरे), मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री, गृह (ग्रामीण), मंत्रालय, मुंबई.
५) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) विशेष पोलीस महानिरीक्षक, नागूपर परिक्षेत्र, नागपूर.
८) पोलीस अधीक्षक, भंडारा जिल्हा, भंडारा.
९) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, भंडारा.

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
२) जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा.
३) कार्यासन अधिकारी (व्यय-७/विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) निवड फाईल (पोल-७), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.